**मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मा.महासभेने दि.१९/०७/२०१४ रोजी महानगरपालिका क्षेत्रातील विकास कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्याबाबत पारित केलेला ठराव क्र.२६ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मिभाम-१११४/प्र.क्र.१११/१४/नवि-२८**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३० नोव्हेंबर, २०१६

**संदर्भ:-** १) मिरा-भाईंदर महानगरपालिका मा.महासभा ठराव क्र.२६, दि. १९/०७/२०१४.
२) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.क्र. मनपा/साबां/सप/१८५/ १४-१५ दि.०७/०८/२०१४ चे पत्र.
३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.क्र.मनपा/साबां/सप/२२३/१४-१५ दि.०६/०९/२०१४ चे पत्र.
४) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.क्र.मनपा/साबां/सप/७७/१५-१६ दि.०१/०६/२०१५ चे पत्र.
५) शासन निर्णय समक्रमांक दि.०५/०३/२०१६.
६) आयुक्त,मिरा-भाईंदर महानगरपालिका यांचे जा.क्र.मनपा/साबां/सप/६९७/१५-१६ दि.१४/०३/२०१६ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना:-**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या मा.महासभेने दिनांक १९जूलै,२०१४ रोजी पारित केलेला ठराव क्र.२६ च्या संदर्भात महानगरपालिका क्षेत्रातील विकास कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्याबाबतचा ठराव क्र.२६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील अनुसूची “ड” प्रकरण-२, कलम १ (म) मधील तरतूदीशी विसंगत असल्याने, उक्त ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (१) नुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करून उपरोल्लेखित संदर्भ क्र.५ येथील शासन निर्णयान्वये निलंबित करण्यात आला आहे.

महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील उपरोल्लेखित तरतूद विचारात घेता, महापौर, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांच्याकडून याबाबत केलेली कार्यवाही उक्त तरतूदीनुसार करण्यात आलेली नाही.मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेच्या दिनांक १९ जूलै,२०१४ रोजी पार पडलेल्या बैठकीमध्ये महानगरपालिका क्षेत्रातील विकास कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्याबाबत करण्यात आलेला उक्त ठराव मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेच्या ठराव क्र.२६ दिनांक १९जूलै,२०१४ रोजी पारित करण्यात आला.उक्त ठरावाच्या निलंबनाच्या अनुषंगाने आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भ क्र.६ येथील पत्रान्वये सादर केलेल्या अहवालात नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता,तसेच मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने पारित केलेला उक्त ठराव क्र.२६ दिनांक १९जूलै,२०१४ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील अनुसूची “ड” प्रकरण-२,कलम १ (म) मधील तरतूदीशी विसंगत असल्याने सदर ठराव अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

मिरा-भाईंदर महानगरपालिकेच्या महासभेने दिनांक १९ जूलै, २०१४ रोजी महानगरपालिकेतील विकास कामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय व आर्थिक मान्यता देण्याबाबतचा ठराव क्र.२६ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील अनुसूची “ड” प्रकरण-२ कलम १ (म) मधील तरतूदीशी विसंगत असल्याने सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ४५१ (३) नुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करून अंतिमतः विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०१४१६१९६५२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2016.11.30 14:18:34 +05'30'

( ज.ना.पाटील )

**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
२) महापौर, मिरा-भाईंदर महानगरपालिका, जिल्हा ठाणे.
३) आयुक्त, मिरा-भाईंदर महानगरपालिका,जिल्हा ठाणे.
४) सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
५) निवडनस्ती (नवि-२८).